**पदस्थापना देणेबाबत.**

डॉ. आर.आर. धर्माधिकारी,
पशुधन विकास अधिकारी (गट-अ)

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**

शासन आदेश क्र.पसंप्र-२०१५/प्र.क्र.१०१/पदुम-१
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०० ०३२
दिनांक - १६ जानेवारी, २०१७

**वाचा** :- आयुक्त पशुसंवर्धन यांचे पत्र क्र पविअ-१/ धर्माधिकारी/३३१/२०१६ पसं-२,दि.२३.११.२०१६

**प्रस्तावना:-**

डॉ.राजेंद्र धर्माधिकारी,हे पविअ, पवैद श्रेणी-१, वळवणे, ता.पारनेर,जि.अहमदनगर येथे कार्यरत असतांना त्यांना लाचेचा सापळा प्रकरणी दि.३.१२.२००३ च्या शासन आदेशान्वये शासन सेवेतून निलंबीत करण्यात आले होते. डॉ. धर्माधिकारी यांच्या विरुध्द लाचलुचपत प्रतिबंधक कायदा अंतर्गत न्यायालयात अभियोग दाखल करण्यास परवानगी देण्यात आली होती. त्यानुसार अतिरिक्त सत्र न्यायाधिकरण, अहमदनगर येथे विशेष प्रकरण क्रमांक ८/२००४ हे प्रकरण प्रलंबित होते. सदर प्रकरणांमध्ये मा.न्यायालयाने दि.३१.१.२००८ मध्ये निर्णय देऊन डॉ.धर्माधिकारी यांना दोषमुक्त केले आहे. सदर आदेशाविरुध्द मा.उच्च न्यायालय,खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेले अपिल क्र.२४४/२००८ हे मा.उच्च न्यायालयाने फेटाळले. सदर निर्णयाविरुध्द मा.सर्वोच्च न्यायालयाने एसएलपी दाखल करण्यात येऊ नये असा निर्णय ॲन्टी करप्शन ब्युरो यांनी घेतला. त्यामुळे शासन आदेश दि.३.८.२००९ अन्वये डॉ.धर्माधिकारी यांचे निलंबन रद्द करुन त्यांना शासन सेवेत पुन:स्थापित करण्यात आले. तसेच त्यांची पदस्थापना पवैद श्रेणी-१, बावी, ता.सिन्नर,जि.नाशिक या पदावर करण्यात आली आहे. त्यानुसार डॉ.धर्माधिकारी दि.१३.८.२००९ रोजी सदर पदावर रुजू झाले. त्यानंतर डॉ.धर्माधिकारी दि. १.१२.२००९ पासून कामावरुन गैरहजर राहीले. डॉ.धर्माधिकारी यांच्या अनधिकृत रजेच्या अनुषंगाने त्यांचे विरुध्द महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपिल) नियम-८ अन्वये विभागीय चौकशीची कार्यवाही सुरु आहे.

२. डॉ..धर्माधिकारी हे वरील प्रमाणे अनधिकृतरित्त्या कर्तव्यावरुन गैरहजर असतांना त्यांना स्वेच्छा सेवानिवृत्ती मिळावी तसेच न्यायालयीन आदेशानुसार त्यांना दोषमुक्त केले असल्याने त्यांना सदर कालावधीचे वेतन व भत्ते देण्यात यावे या कारणास्तव त्यांनी मॅट औरंगाबाद येथे मूळ अर्ज क्र.१८/२०१४ दाखल केला होता. तथापि, अनधिकृत रजेवर असतांना व सदर कालावधी नियमीत करण्याबाबत अद्यापि निर्णय झालेला नसतांना तसेच विभागीय चौकशी सुरु असल्यामुळे मॅट औरंगाबाद यांनी दि.२३.१.२०१५ रोजी आदेश पारीत करुन मुळ अर्ज.१८/२०१४ हे प्रकरण खारीज केले आहे.

३. दरम्यान डॉ.धर्माधिकारी यांनी मॅट औरंगाबाद मुळ अर्ज क्र.१८/२०१४ मध्ये दि. २३.१.२०१५ रोजी दिलेल्या निर्णयाविरुध्द मा.उच्च न्यायालय,खंडपीठ औरंगाबाद येथे रिट याचिका क्र. २३१४/२०१५ दाखल केली होती. त्यामध्ये त्यांनी स्वेच्छा सेवा निवृत्ती मिळण्यात यावी, सेवा निवृत्ती वेतनाचे फायदे देण्यात यावे तसेच सदर प्रकरण निकाली निघेपर्यंत तात्पुरते निवृत्ती वेतन देण्यात यावे. अशी विनंती मा.न्यायालयास केली आहे. सदर प्रकरणांमध्ये मा.उच्च न्यायालयामध्ये खंडपीठ औरंगाबाद यांनी दि. १५.६.२०१६ रोजी निर्णय देऊन मॅट औरंगाबाद यांनी दि. २३.१.२०१५ चे आदेश कायम केले व सदर रिट पिटीशन खारीज केले आहे.

४. वरीलप्रमाणे मा.उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेली रिट याचिका न्यायालयाने दि. १५.६.२०१६ रोजी खारीज केली असल्यामुळे स्वेच्छा सेवानिवृत्ती मंजूर होणार नसल्याने डॉ. आर.आर.धर्माधिकारी, पशुधन विकास अधिकारी (गट-अ) यांनी त्यांना शासन सेवेत रुजू करुन घेण्याची व पदस्थापना देण्याची विनंती त्यांचे दि.३०.९.२०१६ व दि.३.१०.२०१६ च्या विनंती अर्जाद्वारे शासनास तसेच सहआयुक्त पसं (मुख्यालय) पुणे यांना केली. डॉ.धर्माधिकारी हे दिर्घकाळ रजेवर असल्याने वैद्यकीय मंडळ, ससून सर्वोपचार रुग्णालय,पूणे यांचेकडे त्यांना वैद्यकीय तपासणीसाठी पाठविण्यात आले असता, डॉ.धर्माधिकारी हे

शासन सेवेत कार्य करण्यास सक्षम असल्याचे “प्रमाणपत्र” वैद्यकीय मंडळाने दि. १६.११.२०१६ रोजी दिले आहे. त्यानुसार डॉ.धर्माधिकारी हे दि.२३.११.२०१६ रोजी (म.पू.) आयुक्त पशुसंवर्धन,पुणे यांचे कार्यालयात रुजू झाले.

**शासन आदेश** :-

डॉ.धर्माधिकारी यांनी स्वेच्छा सेवानिवृत्ती मिळावी या कारणास्तव मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, खंडपीठ औरंगाबाद व मा.उच्च न्यायालय खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेली न्यायालयीन प्रकरणे फेटाळण्यात आली आहेत. डॉ. धर्माधिकारी यांनी त्यांना विभागात रुजू करुन घेऊन पदस्थापना देण्याची विनंती शासनास केली आहे. डॉ.धर्माधिकारी यांना वैद्यकीय तपासणी करिता पाठविण्यात आले असता, वैद्यकीय मंडळाने डॉ.धर्माधिकारी हे शासन सेवेत कार्य करण्यास सक्षम असल्याचे “प्रमाणपत्र” दिले आहे. त्यानुसार डॉ.धर्माधिकारी हे विभागात रुजू झाले असल्याने त्यांना पदस्थापना देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार डॉ.धर्माधिकारी यांना खालीलप्रमाणे रिक्त पदावर पदस्थापना देण्यात येत आहे.

| अधिका-यांचे नाव व पदनाम | पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|
| डॉ. आर.आर.धर्माधिकारी, पशुधन विकास अधिकारी (गट-अ) | पशुधन विकास अधिकारी, आधारभूत ग्राम उपकेंद्र, टाकळसिंग,ता.आष्टी, जि.बीड | रिक्त पदावर |

५. डॉ.धर्माधिकारी यांनी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी तात्काळ रुजू व्हावे. रुजू झाल्यानंतर रुजू अहवाल शासनास सादर करावा.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०११६१६५५१०४००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shashank Madhav Sathe

Digitally signed by Shashank Madhav Sathe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=11a06bf85893554ac5cded657c0f1435af29a0ad118fb759493176e40002b178, cn=Shashank Madhav Sathe
Date: 2017.01.16 16:58:57 +05'30'

**( श. मा. साठे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत** :-

१. आयुक्त पशुसंवर्धन, पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
२. प्रादेशिक पशुसंवर्धन सहआयुक्त औरंगाबाद विभाग,औरंगाबाद
३. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद,बीड
४. जिल्हा पशुसंवर्धन उपआयुक्त, बीड
५. जिल्हा पशुसंवर्धन अधिकारी, जिल्हा परिषद,बीड
६. जिल्हा कोषागार अधिकारी, जि.बीड
७. डॉ. आर.आर.धर्माधिकारी, पशुधन विकास अधिकारी ,संकेत,प्लॉट नं.१,श्रीकृष्ण नगर,
८. पाईप लाईन रोड, सावेडी,अहमदनगर, जि.अहमदनगर- ४१४००३
९. निवड नस्ती.